**राज्यातील दूरसंचार पायाभूत सुविधा उभारणीच्या परवानगीसाठी महासंचार पोर्टलवरील ३० दिवस वा त्यापेक्षा अधिक दिवसांपर्यंत कोणतीही कार्यवाही न करण्यात आलेल्या प्रलंबित अर्जांना "Deemed Approval" ची तरतूद लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: मातंसं ०६५/प्र.क्र.११८/से-४/३९**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२

दि. ११ ऑगस्ट, २०२३

<u>वाचा</u> : १) मातंसं०६५/प्र.क्र.१/२०१८/३९, दि.१७.०२.२०१८

२) मातंसं ०६५/प्र.क्र.७/२०२२/से४/३९, दि.४.११.२०२२

**शासन परिपत्रक -**

सदर परिपत्रकाव्दारे सर्व संबंधित विभागांना व कार्यालयांना असे सूचित करण्यात येत आहे की, महासंचार पोर्टलवरील प्रलंबीत अर्जांवर दि.१८ एप्रिल, २०२३ पासून महासंचार प्रणालीवर ६० दिवस व त्यापेक्षा जास्त दिवस प्रलंबित असलेले अर्ज ज्याच्यांवर काहीही कार्यवाही करण्यात आलेली नाही अशा सर्व अर्जांना "Deemed Approval" लागू करण्यात आलेली आहे. तसेच दि.९.०८.२०२३ रोजी मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत "Deemed Approval" च्या तरतूदीत सुधारणा करुन ६० दिवसांच्या ऐवजी ३० दिवस करण्याचा तसेच "Deemed Approval" ची तरतूद लागू करण्यापूर्वी ज्याच्यांवर अद्याप कोणतीही कार्यवाही झालेली नाही अशा प्रलंबित अर्जांना देखील "Deemed Approval" च्या तरतूदीनुसार मान्यता देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

या परिपत्रकान्वये ३० दिवस वा त्यापेक्षा अधिक दिवसांकरीता कोणतीही कार्यवाही न होता प्रलंबित असलेल्या सर्व अर्जांना "Deemed Approval" लागू करण्यात येत आहे.

सर्व संबंधित प्राधिकरणांनी/ कार्यालयांनी अशा "Deemed Approval" देण्यात आलेल्या अर्जांसाठी शुल्काची आकारणी व वसूली करुन योग्य त्या सूचनांसह परवानगीपत्र जारी करण्यात यावे. ज्या संबंधित प्राधिकरणांच्या कार्यवाही न केल्यामुळे अर्जांना "Deemed Approval" ची मान्यता देण्यात आली अशा प्राधिकरणांवर सदर जबाबदारी निश्चित करण्यात येत आहे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०८१११८१५१९४८०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by AMBADAS SAHEBRAO CHANDANSHIVE
Date: 2023.08.11 18:19:54 +05'30'

**( अं. सा. चंदनशिवे )**
उप सचिव

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परीषद, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव, मंत्रालय,मुंबई
६) सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग
७) सर्व विभागीय आयुक्त
८) आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
९) सर्व जिल्हाधिकारी.
१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद.
११) सर्व मुख्याधिकारी, नगर पालिका, नगर परीषद, नगर पंचायत.
१२) निवड नस्ती.